# श्रीपाद श्रीवल्लभ संपूर्ण चरित्रामधील कथांच्या माहितीचा तक्ता

# अध्याय 31

# दश महाविद्या वर्णन

दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा।।   श्रीपाद राजं शरणं प्रपद्ये।।   ।दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा।।

| अध्याय, पान क्र. चर्चा कोणाकोणात होत आहे? कथानक | स्थळांचा उल्लेख व नकाशा संदर्भ |
| --- | --- |

# श्रीपाद श्रीवल्लभ संपूर्ण चरित्रामधील कथांच्या माहितीचा तक्ता

अध्याय 31, पान 202. कथाभाग

1. शंकर भट्ट म्हणतात, धर्मगुप्तांसमावेत रोज संध्याकाळी कृष्णा नदी ओलांडून पैलतीराला येत असू.

श्रीपाद वल्लभांच्या सानिध्यात चर्चांमधून अनेक दिव्य रहस्ये कळत. धर्मगुप्त म्हणाले, 'एकदा दशमहाविद्या वर्णन करावे म्हणून विनंती केली.'

लोपामुद्रा अगस्त्य चरित्र महर्षींनी चार तपे सामर्थ्यामुळे विदर्भ राज्याला कन्या झाली. तिचे नाव लोपामुद्रा ठेवले गेले. ती तरुण होतास अगस्त्य ऋषींनी तिच्याशी विवाह करण्याची इच्छा राजाजवळ प्रदर्शित केली. कसे टाळावे या विवंचनेत राजा पडला. नकार दिला तर वृद्ध तपस्वी शाप देतील अशी भीती व दोघांच्या वयातील अंतर यामुळे अनुमती द्यावी की नाही अशा संकटात ते पडले. परंतु लोपामुद्राने 'मी 2. अगस्ती ऋषी माझ्यासाठी मी जन्मले आहे. मी त्यांच्याशी विवाह करणार'असे म्हटल्यामुळे प्रश्नच निकालात निघाला. पुढे वातापी इल्वल या बंधूंचा, विंध्याचा गर्व भंग केला. दक्षिणेत राहून तमिळ भाषेतील व्याकरण बनवले. या नंतर कल्की अवतारात अगस्त्य गुरू म्हणून अवतरित होतील.



अगस्त्य महर्षी

# श्रीपाद श्रीवल्लभ संपूर्ण चरित्रामधील कथांच्या माहितीचा तक्ता

2.मग श्रीपाद दैवी महादशा विद्या यातील प्रत्येक महा विद्येचे वर्णन करतात.
पहिली काली,
दुसरी तारा,
तिसरी छिन्नमस्ता,
चौथी षोडशी माहेश्वरी,
पाचवी भुवनेश्वरी,
सहावी त्रिपुर भैरवी,
सातवी धूम्रावती,
आठवी बगलामुखी,
नववी मातंगी,
दहावी कमलालया. असा बोध करून श्रीपाद म्हणाले,
ही पोथीचे वाचन करायची रीत सांगतो. प्रत्येक महिन्यात येणाऱ्या कृष्ण अष्टमीला व्रत करा. तुमच्या सर्व इच्छा पूर्ण होतात. 11 जणांना भोजन द्यावे किंवा तितके पैसे द्यावे. त्यामुळे लगेच फलप्राप्ती होते. ह्या चरित्रामृतचा महिमा काय? श्रीपाद म्हणाले की हा ग्रंथ सामान्य समजू नका. पारायण



करीत असताना त्यातील अक्षराची शक्ती माझा भाव चैतन्यात प्रभावित होतात नकळत तुम्ही माझ्या भाव संपर्कात येता. त्यामुळे तुमच्या सर्व धर्मयुक्त इच्छा माझ्या कृपेने पूर्ण होतील.  तुमच्या देवघरात जपून ठेवल्यास शुभ स्पंदने देत राहिले.

अध्याय एकतीस समाप्त.

।। श्रीपाद श्रीवल्लभांचा जय जय कार असो।।

# श्रीपाद श्रीवल्लभ संपूर्ण चरित्रामधील कथांच्या माहितीचा तक्ता

# अध्याय 32

# नवनाथ वृतांत

दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा।।     श्रीपाद राजं शरणं प्रपद्ये।।   ।दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा।।

| अध्याय, पान क्र. चर्चा कोणाकोणात होत आहे? कथानक | स्थळांचा उल्लेख व नकाशा संदर्भ |
| --- | --- |

अध्याय 32, पान 205 कथानक

1. पंच पहाड सर्वेश्वर श्रीपादांच्या चरणांना स्पर्श करून शंकर भट्ट यांनी त्यांना विनंती केली, 'हे महाप्रभू नवाथ नावाचे सिद्धयोगी आहेत. ते सर्व दत्तप्रभूंचे अवतार आहेत असे मी ऐकले आहे. याबद्दल सविस्तर माहिती द्या.

नवनाथ वृत्तान्त

नवनाथ यांचे नाव ऐकताच श्रींच्या  दृष्टीतून अमृतवृष्टी  प्रभावित होऊन सर्व चराचर सृष्टीवर पसरत आहे असे जाणवले. ते म्हणाले, ' बाळानो, मच्छिंद्र, गोरक्षक, जालंधर, गहनी, अडभंग, चौरंग, भर्तरी, चर्पट असे नवनाथ आहेत. यांच्या स्मरणमात्रेने शुभफळ सिद्धी प्राप्त होते. नव कृष्ण आणि नवनाथ यात फरक काय? यावर श्रींचे भाष्य होते,' बाळानो, समस्त सृष्टाचा महासंकल्प मीच! देवी देवतांचे संकल्प हे माझ्या संकल्पाचे अंशमात्र असतात. या अंश मात्र संकल्पात थोडे स्वातंत्र्य असते. उदा. शेतकरी गाईला झाडाला बांधून ठेवतो. पण तिच्या गळ्यातला दोर चांगलाच लांब असतो.  त्या दोरीच्या लांबीपर्यंत ती गाय मुक्तपणे चारा चरू शकते. त्या गाईसाठी चारा चरण्याचा परिघ त्या दोरीमुळे ठरलेला आहे. ती तिची स्वतंत्रता असते व तीच तिची




नववाथ दर्शन

| | |
|---|---|
| मर्यादा असते. त्यापलिकडे जायचे असेल तर शेतकऱ्याची अनुमती लागते. म्हणजे त्याने तिला दुसऱ्या जागी बांधायला हवे किंवा दोरीतरी अधिक लांब करायला हवी.<br>अध्याय 32 समाप्त. | **साईबाबा विषयी विवरण**<br>**इंद्रिय तत्व शांत करणारे साई तत्व आहे.** असे विविध विषयांवर आपले विचार व्यक्त केले.<br>धीशीला नगरीत ते भक्त रक्षणार्थ अवतरतील. |

।। श्रीपाद श्रीवल्लभांचा जय जय कार असो ।।

# श्रीपाद श्रीवल्लभ संपूर्ण चरित्रामधील कथांच्या माहितीचा तक्ता

अध्याय 33, पान 208. कथाभाग

1.श्रीपादांनी स्वतःरमणीय व श्री नरसिंह रायाचे लग्न लावले

श्रींच्या आदेशानुसार आम्ही पीठिकापुरात जायला लागलो. त्या वेळी कृष्णेच्या पलिकडच्या तीरावर दगडावर चरणमुद्रा पाहून चकित झालो. श्रीपादांच्याआज्ञेप्रमाणे कुरवपुराहून शंकर भट्ट आणि धर्मगुप्त कृष्णा नदी ओलांडून पंच पहाड नावाशी आलो असता नरसिंह राव नावाच्या एका शेतकऱ्यांने आमचे स्वागत केले. तो श्रीपादांच्या लीला वैभवाचे कथन करू लागला. म्हणाला, 'मी मामा कडे परिस्थितीमुळे रहात होतो. मामाची शेतीवाडी होती व त्यांना रमणी नावाची मुलगी होती. तिचे माझ्या वर प्रेम होते. मामी दुष्ट स्वभावाची होती, त्यामुळे मला कष्टप्रद जीवन जगावे लागत होते.




नकाशा पंचदेवपहाड

# श्रीपाद श्रीवल्लभ संपूर्ण चरित्रामधील कथांच्या माहितीचा तक्ता

एकदा एक मांत्रिक आमच्या घरी आला. मामीला त्याने बनवून घराचा ताबा मिळवला. हळूहळू आमच्या घरातील वातावरण बदलले. आमची सर्व संपत्ती नष्ट झाली मामा व मामी , माझी, रमणीची पण शरीर प्रकृती बिघडली. हे सर्व घडत असताना एके दिवशी एक याचक दरवाजामध्ये आला. परिस्थितीमुळे वैतागलेल्या आम्हाला वैताग आलेला होता. त्यामुळे त्याला मामीने 'हे दारिद्र्य भिक्षा म्हणून घे'असे म्हंटले. ते त्याने नाकारले. त्या वेळी मी माझ्याजवळ असलेला पूर्वापार वापरात असलेला चांदीचा ताईत दक्षिणा म्हणून दिला. तो त्याने घेतला. आणि मग एकदम चमत्कार घडून मांत्रिकाला त्रास होऊ लागला. मामीचे सर्वांग लुळे पडले. रमणी ठीकठाक दिसू लागली. माझा मरतुकडेपणा गेला. श्रींनी यतिरूपात दर्शन देऊन म्हणाले, खरेतर कालीमाता साधकाच्या अंतर्मनात दडलेल्या कामक्रोधादि राक्षस शक्तींचा विध्वंस करते. ती कोंबड्या-बकऱ्यांचे बळी मागत नाही. खरी कालीकामाता प्रेम, शांती, दया वगैरे शुभ लक्षणांनी युक्त असते. या प्राणमय जगात राक्षस शक्ती, भूतप्रेत आदि निर्माण करणारी कालीमाता होय. 'आम्ही आमके, आम्ही तमके' असा अहंकार मिरवणारे मांत्रिक शूद्र विद्यांची उपासना करून लोकांना




पंचदेव पहाडांचे सेटलाईट इमेज

# श्रीपाद श्रीवल्लभ संपूर्ण चरित्रामधील कथांच्या माहितीचा तक्ता

| | |
|---|---|
| प्रेत आत्म्यालाही ते देवतास्वरूप देतात.' असे म्हणून ते यति गुप्त झाले. | |
| 2.आम्ही आमचे घर धुवून पुसून स्वच्छ केले. मांत्रिकाला हाकलून श्रीपादांनी आशीर्वादपूर्वक आपल्या दिव्य हस्ताने माझे रमणीचे लग्न लावून. तेव्हा श्रीपादांचे वय फक्त बारा वर्षांचे होते. त्यावेळी ते पीठिकापूरलाच होते. परंतु पंचपहाडात अवतरले. त्या दिवशी त्यांनी आशीर्वाद म्हणून अक्षता दिल्या होत्या त्या आम्ही जपून ठेवल्या | 3.आहेत. कारण त्यांची तशी आज्ञा होती ते म्हणाले होते, 'काही काळाने धर्मगुप्त व शंकर भट्ट नावाचे दोन गृहस्थ तुमच्याकडे येतील त्यांना या अक्षता द्या.'<br>शंकर भट्ट म्हणाले, 'आहाहा ऽऽऽ किती हे लीलामय अवतारस्वरुप!'<br>अध्याय 33 समाप्त. |

।। श्रीपाद श्रीवल्लभांचा जय जय कार असो ।।

# श्रीपाद श्रीवल्लभ संपूर्ण चरित्रामधील कथांच्या माहितीचा तक्ता

अध्या 34,पान211.कथानक

1.धर्मगुप्त आणि शंकर भट्ट एकत्र प्रवासास पीठापूरला जात असताना नंतरच्या अद्भुत घटनांची मालिकेतून श्रींच्या इच्छा कशा सफल होतात. याचा अनुभव शंकर भट्ट यांना मिळाला. कधी घोडागाडीने, कधी बैलगाडीने तर कधी पायीच प्रवास करत असताना ते दोघे एका गावात तेथे चाललेला तमाशा पाहून त्यांनी त्यामध्ये पडायचे ठरवले. ऐका शिक्षित ब्राम्हणास भर बाजारात कर्जबाजारी होऊन घरदार गमवायची वेळ आलेली पाहून शंकर भट्ट अनाहूतपणे मधे पडून १५ दिवसात या व्यक्तीचे सर्व धन फेडून द्यायचे वचन देऊन रस्त्यावरील लफड्यात अडकले. आणि अतितांईमुळे पुढील यात्रेत खंड पडल्याने आपल्या कर्माला दोष देत राहिले. पण पुढे ते सांगतात, काम

2. गावातल भोचक्या लोकांनी पैजा लावून नवी अटीतटी निर्माण केली. शरभेश्वरांची बहिण तिच्या पती घरी न आल्याची समस्या सोडवायला  शंकरभट्टांकडे गेली.  शंकर भट्टांनी पती परतेल असे कळवल्याने ती खूष झाली. त्यामुळे शरभेश्वरांनी आपल्या बहिणीचा पती परत येणार नाही असे भाकित चुकीचे ठरले तर ज्या गरीब ब्राह्मणाचे कर्ज फेडायची मी, शंकर भट्टांनी हमी घेतली होती ते सर्व कर्ज मी फेडीन असे म्हणून शपथ घेतली. काही दिवसात बहिणीचा पती परत आला. शंकर भट्ट जिंकले. शरभेश्वरांना अद्दल घडली. दश महाविद्यांपैकी धूम्रावतीचे उपासक म्हणून त्यांनी चुकीच्या मार्गाने पैसे मिळवायला ही विद्या वापरली. त्याची शिक्षा त्यांना मिळाली. ब्राह्मणाचे घर

| | |
|---|---|
| होऊन कर्जबाजारी ब्राह्मणाच्या अवस्थेतून त्याला बाहेर काढे पर्यंत मी शंकर भट्टाने तिथेच थांबून राहायचे ठरवले. | वाचले. पण शंकर भट्ट विचार कर राहिले की मी असे मधे पडायला नको होते. पण माझी ( एका आर्त साधकाची हाक असल्याने) श्रीपादांनी माझी लाज राखली!) ते ठीक झाले पण असे गुरूंना मधे घालणे बरोबर नाही.<br>अध्याय 34 समाप्त. |

।। श्रीपाद श्रीवल्लभांचा जय जय कार असो ।।

# श्रीपाद श्रीवल्लभ संपूर्ण चरित्रामधील कथांच्या माहितीचा तक्ता

अध्याय 35,पान 215. कथाभाग

दुष्कर्म उपासकाला श्रीपादांनी शिक्षा करून रक्षा करणे

1.शंकर भट्ट आणि धर्मगुप्त शरभेश्वर शास्त्रींचा निरोप घेऊनपुढे जातात तेंव्हा त्यांना सिद्ध नावाच्या महर्षींचा आश्रम दिसतो. तो तारादेवीच्या उग्र देवीचे उपासक पूर्ण वैरागी आणि कौपिनधारी होते.दुपारच्या पूजा व भोजनानंतर सिद्ध म्हणाले तुम्ही दोघे येणार हे श्रीपादांनी आधीच सांगून ठेवले होते. तारादेवीच्या विविध रूपांचे वर्णन करून ते म्हणाले, मिथिला भागात महीषी गावात उग्रतारा मातेचे देवालय आहे. तिथे तारा एकजटा, व नीलसरस्वती अशा तीन मूर्ती आहेत. तिथे मला सुरवातीस बालिका, नंतर 'प्रत्यलीढ' (एक पाय खाली सोडलेला, दुसरा



प्रत्यलीढ मुद्रा

| | |
|---|---|
| मांडी घालून अभयकर मुद्रा) नीलवर्ण, मुंडमाला, भोग मोक्ष रूपात भासली. बालरूपातील पायातील पैंजण तिच्या मोठ्या, भव्य देहयष्टीत रुतल्याने तिने मला ते पैंजण काढायला सांगितले. 'हे पैंजण, तू कुठे जायचे, काय खायचे, कुणाशी बोलायचे ते पैंजणच ठरवतील. एवढे सांगून आधी बालिका दिसणारे रूप बालकात घडून तो अदृश्य झाला. | |

# श्रीपाद श्रीवल्लभ संपूर्ण चरित्रामधील कथांच्या माहितीचा तक्ता

पुढे मी सिध्द मुनी, कालीमातेचे दर्शन काली घाटावर घेऊन जगन्नाथ पुरी, सिंहाचल असे करत पादगया क्षेत्रातील पीठिकापुरात आलो. कुक्कुटेश्वराच्या दर्शनाने माझी कुंडलिनी जागृत झाली. मी वेड्या सारखे तारामातेचा नाम उच्चार करीत फिरताना नरसिंह वर्मांकडे एक बालक छकड्यात बसून तो ओढणाऱ्या ला शेजारी बसवून मला तू छकडा ओढ म्हणून बोलावले. तो बालक पुर्वी तारादेवीच्या मंदिरात पाहिलेला होता. असे वाटले. मी ते कमीपणाचे वाटून नकार दिला. पण नाईलाजाने मी तो छकडा ओढून जायला लागलो. तो भरभर जाईना तेंव्हा मला तो दिव्य बालक काठीने पाठीवर रट्टे मारत होता. कशीबशी मार खात मी त्यांच्या आजोबांच्या घरी आलो.



| | |
|---|---|
| वाटेत तो नोकर कशाला उगाच मारता सोडून द्या त्याला, म्हणून रदबदली करू लागला त्याला म्हणाला, तूलाही तीच शिक्षा करीन गप्प बस! लालमिर्चीची पूड मला पाठीवर चोळून चोळून माझा जीव हैराण झालेल्या अवस्थेत बापन्नाचार्यांनी माझी हिन्दीतून विचारपूस केली. नोकराने घडलेल्या घटना सांगितल्या. 'तसे काही झाले नाही. पहा कुठे माराच्या खुणा आहेत का? मिर्ची पूड नाही चंदनाचा लेप आहे असे म्हटले. आणि खरोखरच तिथे चंदनलेप होता! नंतर उलगडा करताना श्री म्हणाले, मी तात्काळ संकल्पना करून सिध्द करताना वस्तू आपल्या स्वभाव धर्म बदलतात.' | सिद्धमुनींची उग्रतारा, नेपाळ ते पीठापुरम यात्रा |
| ' हा अगांतुक ब्राह्मण गुरूच्या संमतीविना संन्यास घेऊन | |

तारादेवीचा उपासक झाला. त्याच्या जन्माला त्याच्या आईचे खूप रक्त गेले. वडिलांना त्रास दिला. तेच आता या आपल्या नोकराच्या रुपात आहेत. आता काशी क्षेत्रात ९ महिने ९ दिवस ९ घटका रहा. म्हणजे पितृशाप नाहीसे होतील. '
त्यांच्या आदेशानुसार मी वागून तारादेवीला प्रसन्न करून घेतले. मिळालेले पैंजण देवघरात ठेवले. तंत्र सिद्धिने लोकांच्या व्याधी बऱ्या करतो. तुम्ही ईकडे येणार त्यावेळी त्यांना पैंजण देऊन सत्कार करण्यात यावा अशी आज्ञा मिळाली.' त्यांनी ते पैंजण प्रेमाने आम्हाला दिले. मग आम्ही पुढे निघालो अध्याय 35 समाप्त.

# श्रीपाद श्रीवल्लभ संपूर्ण चरित्रामधील कथांच्या माहितीचा तक्ता

# अध्याय 36

# वेदांत शर्मा वृत्तांत

दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा।। श्रीपाद राजं शरणं प्रपद्ये।। ।दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा।।

| अध्याय, पान क्र. चर्चा कोणाकोणात होत आहे?<br>कथानक | स्थळांचा उल्लेख व नकाशा संदर्भ |
|---|---|

# श्रीपाद श्रीवल्लभ संपूर्ण चरित्रामधील कथांच्या माहितीचा तक्ता

अध्याय 36,पान 218. कथानक

मिळालेल्या पैझणाचे मधुर छुमछुम आवाज आम्हाला आमच्या शरीरावर विशेष करून अनाहत चक्रातून अन्य चक्रात प्रसारित करत असल्याचे जाणवत असे. अशाप्रकारे प्रवास करत असताना धर्मगुप्त आणि शंकर भट्ट एका आश्रमांपाशी आले. तिथे तेजस्वी वेदांत शर्मा व पत्नी बंगारम्मा नामक ३० वर्षाची योगिनी माता भेटले..

ते सांगतात, मी पीठिकापुरात ब्राह्मण होतो. ही मातंग समाजातील स्त्री होती. माझे ३ विवाह होऊनही विधूर होतो. श्रीपाद मला म्हणायचे, 'तुम्ही एका बाईशी विवाहित न होता धर्मपत्नी म्हणून स्वीकारले तर तुम्हाला उत्तम जन्म प्रसाद देईन! मी चक्रावलो.



मातंगी देवी

# श्रीपाद श्रीवल्लभ संपूर्ण चरित्रामधील कथांच्या माहितीचा तक्ता

पीठिकापुरात बापन्नाचार्यांचे प्रस्थ फार माजले आहे. त्यांचा नातू काहीही ब्राह्मणाच्या कुलाचार न करता इतर खालच्या जातीच्या लोकांत मिसळतो हे माझ्या सह अनेक ब्राह्मण वर्गाला खटकत असे मला चांभार स्त्री ला विवाह न करता रहायला सुचवून आम्हा ब्राह्मणांचा अपमान केला आहे असे म्हणून त्यांच्या कुटुंबियांना वाळीत टाकायची संधी आयती मिळते आहे, म्हणून आम्ही ब्राह्मण सभा आयोजित केली. त्यात श्रीपादांनी पुरुषांनी कितीही स्त्रियांशी विवाह केला तर चालेल मग तसा हक्क स्त्रीयांना का नाही? असे म्हटले. ते आम्हा ब्राह्मण कुळातील पुरुषांना अमान्य होते. यावर बराच खल झाला.

मी शंकराचार्य वगैरे कोणाला मानत नाही असे म्हटले. आम्हाला कुलबहिष्कृत करायला हे सर्व नाटक आहे. ते मी घडून देणार नाही. तसे करून विनाशाला निमंत्रण देत आहोत. असे वाटून मी त्यांच्या म्हणण्यानुसार बंगारम्माला घेऊन गावातून बाहेर पडलो. असे फिरताना इथे मातंगी देवीची प्रतिष्ठापना करून आश्रम करून राहत आहे. ह्या मातंगी मातेची मूर्ती नंतर अनेक थोर सिध्द पुरुषांची सेवा घेईल. आदेश असा देखील होते की शंकर भट्ट व धर्मगुप्त येतील तेंव्हा त्यांच्या कडील पैंजण घेऊन तुमच्या जवळच्या चामडी पादुका द्या. '

या पादुका म्हणजे बंगारमच्या गो भक्तीचा प्रसाद आहे. असे समजून नेहमी सिध्द मंगल स्तोत्र म्हणत चला असा आदेश



मातंग जातीचे लोक बुट्ट्या आणि बांबूच्या परड्या हारे बनवत असत.. इथे चांभार काम करताना 100 वर्षांपुर्वीचे प्रातिनिधिक चित्र...

।। श्रीपाद श्रीवल्लभांचा जय जय कार असो ।।

| | |
|---|---|
| आहे?<br>कथानक | |
| अध्याय 37,पान 223. कथानक<br>चर्मपादुकांचा प्रचंड प्रभाव जाणवणारा भीषण अनुभव, शंकर भट्ट आणि धर्मगुप्त यांना एका रात्रीत आला. आक्रोश करत काही योगिनी आम्ही रानातील एका वडाच्या झाडाखाली रात्र काढायला गेलो होतो तिथे आल्या. आमच्याकडे साड्या देत या नेसा म्हणून आमची पुरुषांचे कपडे पेटवलेल्या आगीत टाकून दिले. मांस आणि मद्य पाजून आम्हाला शंकर अम्मा आणि धर्म अम्मा अशी नावे दिली. मध्यरात्री छिन्नमस्ता देवीची आराधना करतो. योग परिभाषेत तिला परिपूर्ण अंतर्मुखतेचे प्रतीक मानतात.. मशाली | <br>योगिनीप्रमाणेवेषातील चंचू अदिवासी |

नाचवत रात्री योगिनी विविध वाद्यांचा कोलाहल करू नाचत नाचत आम्हाला बळी द्यायला गळ्यात कडुनिंबाची पानांचा हार घालून कपाळावर मोठा थोरला कुंकवाचा टिळा लावून आमच्या माना धरून तलवारीने कापून टाकल्या! शरीर जळत आहे असे वाटले. योगिनींच्या क्रूर निम्नश्रेणीच्या क्षुद्र विद्येचे आपण बळी झालो अशी भावना झाली. निद्रावश होत आहे असे भासले कोणीतरी आमची मस्तके धडाला जोडत आहे असे वाटले.... पहाटे जाग आली तेव्हा आमच्या अंगावर साडी चोळी होती आणि आम्ही पुरुष रूपात असल्याचे जाणवले.

एका वाटसरूने म्हटले अहो, काल रात्री जे अनुभवले ती सर्व अत्यंत रहस्यमय योग प्रक्रिया होती. विश्वचैतन्याला स्त्री पुरुष भेद नाही. या योग प्रक्रियेत अन्यथा कष्टसाध्य सुषम्ना नाडी मार्ग

उघडले आहेत.

हे महद भाग्य उघडायचे कारण तुमच्या जवळच्या चामड्याच्या पादुका आहेत. धर्म देह चैतन्यातून सुटून तुम्ही दिव्यत्वाच्या अनुसंधानात पोहोचला आहात. श्रीपादांची दिव्य लीला तेच जाणतात...

अध्याय ३७ समाप्त.




।। श्रीपाद श्रीवल्लभांचा जय जय कार असो।।

# श्रीपाद श्रीवल्लभ संपूर्ण चरित्रामधील कथांच्या माहितीचा तक्ता

अध्याय 38, पान 225. कथाभाग

बगलामुखी आराधना विवरण

पुढच्या प्रवासात एका पिंपळाच्या झाडाखाली एक बैरागी वजा तेजस्वी महापुरुष भेटला. तुमच्याकडे चर्मपादुका मला द्या आणि माझ्या जवळच्या कालनागमणी ला घेऊन जा. असे म्हणून चकीत केले  शंकर भट्ट त्यांना म्हणाले, अहो मी श्रीपादांचे दिव्य चरित्र लिहायचा संकल्प केला. मला त्यांच्या जीवनातील प्रत्येक वर्षातील घडलेल्या घटना सांगणारे भक्त भेटत आहेत याचे रहस्य काय आहे? ते ऐकून बैरागी आपले पूर्वचरित्र सांगू लागले. मी बंगाली. बगलामुखी देवीचा उपासक.

दशमहाविद्येतील ही एक देवी आहे. तिला वैष्णवी, ज्वालामुखी,




कलहोली कांगडा  हिमाचल प्रदेश

| | |
|---|---|
| उल्का मुखी वगैरे अनेक नावे आहेत.<br>मला दृष्टांत झाला की दत्त म्हणतात की दत्तावतारात अस्पृश्यता पाळत नाहीत. मी दत्त रूपात या कुक्कुटेश्वर मंदिरात कर्मठ ब्राह्मण लोकांच्या मुळे माझ्या अनेक अन्य लोक जाती जमातीच्या भक्तांपासून दूर झालेलो आहे. मी ते ओळखले पण मला माझ्या देवीचे रुप पाहायचे आहे असेमनात म्हणत असताना श्रीपादांच्या मधे बगलामुखी देवतेचे दर्शन झाले.. | |
| मी मुर्छित झालो. बहुतेक ८ दिवस तरी असाच पडलो असताना माझ्या पश्चात तेथील ब्राह्मण पुजारी वर्गाने मी क्षुद्र विद्येने कुक्कुटेश्वराशी काही साधना करताना मेलो पहा तरी विधिपूर्वक पुजापाठामुळे मी मेले नाही अशी हाकाटी केली. मात्र त्यांनी | |

# श्रीपाद श्रीवल्लभ संपूर्ण चरित्रामधील कथांच्या माहितीचा तक्ता

पुजाऱ्यांच्या भाविकांनी दिलेल्या संभावना (दान दक्षिणा) मंदिरात जमा करण्याऐवजी घरी नेऊन लपवल्या जात. ते बिंग श्रींनी उघडे पाडले.  त्या आसपास एक पुराणिक कथा कीर्तने करायला आला होता. त्याला पंडित पुजाऱ्यांच्या दांडगाईने मंदिरात प्रवेश नसलेल्या समाजात तू प्रवचने दे मात्र त्यांनी दिलेल्या दानात आम्हाला निम्मा दे असे सांगितले. तो बिचारा हो म्हणाला. श्रीपादांनी याच काळात मला स्पर्ष करून उठवले. आणि त्यांना दूध घालणाऱ्या लक्ष्मीचा पुढच्या जन्मात या पुराणिकाने तिचा पती व्हावा याची सोय केली.

काहीसे विस्कळीत कथाभाग हे सांगून जातो की श्रीपादवल्लभ चरितामृताचे अध्ययन करणाऱ्या मुमुक्षूंचा अध्यात्मिक उन्नतीचा प्रवास देखील क्रमाक्रमाने सुरवात होतो.



बगलामुखी माता देवी

| | |
|---|---|
| अध्याय 39, पान 230. कथानक.<br>बैराग्याने चर्मपादुकांचा बदल्यात दिलेला कालनागमणी घेऊन आम्ही पुढे निघालो. पीठिकापुरात केंव्हा पोहोचतोय असे वाटत असतानाच एका विचित्र घरात त्यांचे आतित्थ झाले. त्यांच्या घरभर साप, नाग वळवळत फिरत असत. त्यांचे नाव होते नागेंद्र शास्त्री. | |

ते सर्पांना आपल्या मुलांप्रमाणे वागवत असत. अंगावर सर्प यथेच्छ खेळताना पाहून भिती वाटत असे. नागेंद्र शास्त्री सांगतात, तेंव्हा श्रींचे वय १५ होते. मी पीठिकापुरात कालमणी प्राप्त व्हावा म्हणून कुक्कुटेश्वर मंदिरात दत्ताचे दर्शन घेतले. तिथे मला श्रींनी बोलावून ताम्रपादुका देत म्हटले, नागेंद्र शास्त्री, तू नागेंद्र पीठ स्थापन करण्यात. या पादुकांची पूजा कर. तुझ्या नागशास्त्र वैद्यकीय ज्ञानाने अनेकांना उपयोग कर. नागदोषांचे परिहार कर. कालांतराने धर्मगुप्त आणि शंकर भट्ट भेटतील. तू तो पर्यंत पूजा करून ठेवलेल्या पादुका त्यांना दे ते तुला कालमणी देतील तो तू स्वीकार कर.

असा आपली वाट पहात माझा कालक्रमण होताना माझ्याकडून चूक झाली. एका न्हावी समाजातील एकाच्या पत्नीवर इलाज करताना तिला



नाग देवता

वाचवले पण त्या आधी माझी पत्नी निवर्तल्याने मी तिचा जीव व्हाव्याच्या बायकोत घातला. पण ते झेंगड होऊन मला समाजाने वाळीत टाकले. त्या कजाग बाईने मला भंडावून सोडले.
श्रींचा धावा केल्या नंतर त्यांनी मला झापले. तू धनाशा करू नयेस. योग शक्तीचे असे उथळ प्रयोग करू नकोस म्हटले.
कालनागमणी त्याला देऊन त्यांनी पूजा केलेल्या पादुका घेऊन आम्ही पुढची वाट धरली.
अध्याय ३९ समाप्त .

।। श्रीपाद श्रीवल्लभांचा जय जय कार असो ।।

# श्रीपाद श्रीवल्लभ संपूर्ण चरित्रामधील कथांच्या माहितीचा तक्ता

अध्याय 40,पान 233. कथानक

त्रिपुरांतक प्रदेशातील भागात ते दोघे कधी पायीच तर कधी बैलगाडीने तर कधी घोडा गाडीने प्रवास करत असताना ते पुजारी भास्कर शास्त्रींकडे उतरले. ते त्रिपुरांतकेश्वर मंदिरात पुजारी होते. त्यांनी आमच्या जवळच्या पादुकांची प्रतिष्ठापना त्यांच्या घरच्या देव्हाऱ्यात केली. आम्ही प्रवास करत असताना सारखे जाणवत राही की श्री चरण आमच्या बरोबर चालत आहेत. बोलताना, जेवताना त्यांचे अस्तित्व स्पर्षाशिवाय अनुभवायला येई.

त्यांची पूजा भास्कर शास्त्रींकडे झाल्यावर त्यातून आवाज येऊ लागला कि या महासंस्थापनातील पादुकांचे दर्शन घ्यायला

त्रिपुरांतकम



भाविकांची रीघ लागेल. सध्या जरी त्या तांब्याच्या असल्या तरी भावी काळात त्या सुवर्णाच्या होतील...
असे थक्क करणारी वाणी ऐकून आम्ही भास्कर शास्त्रींकडे षोडशी राजराजेश्वरी देवीच्या वैभवाबद्दल सांगावे म्हणून विनंती केली..

## श्री राजराजेश्वरी देवी विवेकाचे प्रतीक

भास्कर शास्त्री म्हणाले, ' शक्ती आणि विवेक एका व्यक्तिविशेषाच्या मधे सापडत नाही. परंतु राजराजेश्वरीच्या अनुग्रहाने ते साध्य होते. तिचा अनुग्रह हवा असेल तर कर्तव्य दक्ष राहून सत्याचा शोध घेत राहिले पाहिजे. मला श्रीपादांचे कृपेने राजराजेश्वरीच्या रूपात दर्शन झाले.
उद्या श्रीपाद श्रीवल्लभ कुठल्या परिस्थितीत पीठिकापुरातून संचाराकरता बाहेर पडले ते सांगेन. आता पुलिहारा म्हणजे चिंचेचा कोळ घातलेला भात महाप्रसाद घ्या. तो श्रींनी आपल्यावा आधी स्वीकार करून मला दर्शन दिले'...

अध्याय ४० समाप्त.



त्रिपुरांतकम  राजराजेश्वरी मंदिर

